सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ मुंबई, यांना वेतनेतर खर्चासाठी सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- लेखाअ-२०२३/प्र.क्र.७५/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र. क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.२६/प्रशा-१, दि.१७/०४/२०२३.
३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे पत्र क्र.कार्यासन-७/रानिवि/८४०, दि.१३/०६/२०२३.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाच्या संदर्भाधिन दि.१३/०६/२०२३ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळास वेतनेतर खर्च भागविण्यासाठी "३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टांसाठी रुपये १,२१,४८,०००/- (रुपये एक कोटी, एकविस लक्ष, अठ्ठेचाळीस हजार मात्र) इतके अनुदान वितरीत करण्यास, या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च करताना वित्त विभागाच्या अनुदान वितरणाच्या अटींचे पालन करावे.

२. यावरील खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टाखालील सन २०२३-२४ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.४६४८/२०२३/व्यय-१६, दि.०३/०८/२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०८१८१४३९१२५५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAMKANT SURESH SONAWANE

Digitally signed by SHAMKANT SURESH SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=9d538bbb1d8b0fb128f2644b7e46b2a597ff7be83401388555b0d4baa1874713, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0FACA31EEA9D440C573E323F027F4B548138E0057E0DAA48093F263662E5B218, cn=SHAMKANT SURESH SONAWANE
Date: 2023.08.28 11:52:23 +05'30'

**( शामकांत सोनवणे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित.**
१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.

३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-३,१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई -३२
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).